पांझण डावा मुख्य कालव्याच्या वितरीका क्र १२ व जुवार्डी मधील सायफन ड्रेन,जलसेत दुरुस्ती भराव व अस्तरीकरण दुरुस्ती करणे या कामांना विशेष दुरुस्ती अंर्तगत प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.५९७/२०२३)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ०७/ ०३/ २०२४

**वाचा :-**

१. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ जळगांव यांचे पत्र.जा.क्र. कासं/तापाविम/ प्रशा -४- /४९६७/ सन- २०२३/ दि. ०३/११/२०२३.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य (कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य (कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि. १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा- २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

गिरणा मोठा प्रकल्प ता. नांदगाव जि. नाशिक सदर प्रकल्प सन १९६९ मध्ये पूर्ण झाला असून सन १९७० मध्ये सिंचन व्यवस्थापनेसाठी हस्तांतरित करण्यात आला आहे. गिरणा प्रकल्प अंतर्गत चार मुख्य कालवे आहे. त्यामध्ये पांझण डावा कालवा हा गिरणा प्रकल्पाच्या डाव्या बाजूला असलेल्या पांझण गावाजवळून सुरू होतो. पांझण डाव्या कालव्याची लांबी ५३.२० किमी असून त्याची संकल्पित वहन क्षमता ७.०९३ क्युमेक्स इतकी आहे.सदर कालव्याद्वारे नाशिक, धुळे, व जळगाव जिल्हयामधील मालेगाव, धुळे, भडगाव व चाळीसगाव या तालुक्यांना फायदे होतात. पांझण डाव्या कालव्याअंर्तगत असलेल्या वितरीका क्र १२ ची एकूण लांबी १२.२० कि.मी. असून त्याचे एकूण सिंचन क्षेत्र १७४१ हे आहे. तसेच तसेच जुवार्डी मायनर ची एकूण लांबी ९.०० कि.मी. असून त्याचे एकूण सिंचन क्षेत्र ६२७.०० हे आहे सदर प्रकल्पाच्या वितरीकेच्या बांधकाम पुर्ण होवून ४९ वर्ष झालेले असून सिंचन कालावधीत मोठ्या प्रमाणात अडचणींना सामोरे जावे लागते. पांझण डावा मुख्य कालव्यावरील संकल्पित वहन क्षमता २५० इतकी असून कालवा फक्त १०० क्युसेक्स प्रवाहीत होत आहे. सिंचन आवर्तनात पांझण डाव्या कालव्यावरील वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील भराव दुरुस्ती व पूर्वी केलेल्या जुन्या UC Lining तसेच सायफन ड्रेन,जलसेतू च्या ठिकाणी मधून मोठ्या प्रमाणात गळती होत आहे. तसेच पाझरण्यामुळे पाणी खुप प्रमाणात वाया जात असून शेजारील शेतात पाणी साचून पिकांचे नुकसान होते आहे व पाणी सतत पाझरत असल्या कारणाने शेत जमीन पाणथळ होत आहे. पांझण डावा कालवा वरील वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनरचा माती भराव ब-याच वेळेस फुटून पाणी वाया गेलेले आहे.

सदर प्रकल्पाच्या कालव्याचे बांधकाम पुर्ण होवून ४९ वर्ष झालेले असून सिंचन कालावधीत मोठ्या प्रमाणात अडचणींना सामोरे जावे लागते. पांझण डावा मुख्य कालव्याची संकल्पित वहन क्षमता २५० क्युसेक्स इतकी असून सद्य:स्थितीत कालवा फक्त १०० क्युसेक्सने प्रवाहीत होत आहे. सिंचन आवर्तनात सदर मुख्य कालव्याच्या भरावांच्या ठिकाणी व पूर्वी केलेल्या जुन्या UCR Lining तसेच वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील विविध बांधकामांमधून मोठ्या प्रमाणात गळती होत आहे. कालव्याला पाणी चालु असतांना बांधकामांमधून, भरावातून मोठ्या प्रमाणात पाणी गळणे तसेच पाझरण्यामुळे पाणी खुप प्रमाणात वाया जात असून, त्यामुळे शेजारील शेतात पाणी साचून पिकांचे नुकसान होत आहे व पाणी सतत पाझरत असल्या

कारणाने शेत जमीन पाणथळ होत आहे. पांझण डावा कालवा गळतीमुळे कालव्याच्या माती भराव ब-याच वेळेस फुटून पाणी वाया गेलेले आहे. कालव्याच्या सिंचन आवर्तन कालावधी मध्ये वाढ होत असल्याने चाळीसगाव व भडगाव परिसरातील शेतक-यांना सिंचन कालावधीमध्ये पाणी उपलब्ध होत नाही व शेतक-यांच्या उत्पन्नामध्ये घट होऊन त्यांच्यामध्ये उदासिनता निर्माण होते व शेतक-यांच्या रोष / तक्रारीला सामोरे जावे लागते. त्यामुळे पांझण डाव्या कालव्यावरील वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील भरावाच्या ठिकाणी नवीन अस्तरीकरण व सायफन ड्रेन,जलसेतू दुरुस्ती प्रस्तावित केली असून त्यामुळे कालव्याची वहन क्षमता पुर्स्थापित होण्यास मदत होणार आहे.तसेच कालव्यातून होणारी पाणी गळती थांबून नजीकच्या शेतक-यांचे शेतीचे नुकसान होणार नाही. तसेच भराव दुरुस्ती मुळे आर्वतना दरम्यान कालवा फ़ुटीची शक्यता देखील कमी होणार आहे.

या पार्श्वभूमीवर पांझण डावा कालव्याच्या पांझण डावा मुख्य कालव्याच्या कालव्याच्या पांझण डावा मुख्य कालव्याच्या वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील सायफन ड्रेन,जलसेतू दुरुस्ती भराव व अस्तरीकरण दुरुस्ती या अंदाजपत्रकास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानूसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

पांझण डावा कालव्याच्या वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील सायफन ड्रेन,जलसेतू दुरुस्ती भराव व अस्तरीकरण दुरुस्ती या अंदाजपत्रकास विशेष दुरुस्ती अंतर्गत रु ३,३७,२८,५३५ (तीन कोटी, सदोतीस लक्ष, अठ्ठावीस हजार, पाचशे पस्तीस फक्त) एवढ्या खर्चाचा प्रस्तावास खालील अटीच्या अधीन राहून सोबत च्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत यापुर्वी स्थापित पाणी वापर संस्थाकडे लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपुर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

६) प्रस्तावित दुरस्तीकामांद्वारे अंदाजे २०७५ हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकारी यांची राहील.

**७) सदर कामास नियामक मंडळाच्या पुढील बैठकीत मंजूरी घेतल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात न करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहिल.**

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७०० ०२५६) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ४८ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३०७१६५२२१७६२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.07 17:01:36 +05'30'

**( न.गौ.बसेर )**
**शासनाच्या उपसचिव**

**सोबत:- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे प्रधान सचिव,
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव.
५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
९) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१६) कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१७) मुख्य अभियंता , तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१८) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव,
२०) कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे विभाग ,जळगांव,
२१) सिं.व्य (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.५९७/२०२३)/ सिंव्य (कामे),**

**दि. ०७ /०३/२०२४ चे सहपत्र**

| Sr.No | Description of Item | Amount in Rs |
|---|---|---|
| 1 | C-Works | |
| | पांझण डावा कालव्याच्या पांझण डावा मुख्य कालव्याच्या वितरीका क्र १२ व जुवार्डी मायनर मधील सायफन ड्रेन,व जलसेतू भराव व अस्तरीकरण दुरुस्ती (Work Portion Cost) | 25925439 |
| 2 | गौण खनिज शुल्क (Royalty) | 2099500 |
| 3 | १ % विमा (Insurance) | 259254 |
| 4 | १८ % वस्तु व सेवा कर (GST) | 4666579 |
| 5 | ३ % अनुषंगिक खर्च (Contingenious) | 777763 |
| 6 | Total Cost of work | 33728535 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.07 17:01:56 +05'30'

**( न.गौ.बसेर )**
**शासनाच्या उपसचिव**